“निसर्ग” चक्रीवादळामुळे निराधार झालेल्या कुटुंबांना एक विशेष बाब म्हणून मोफत अन्न धान्य व केरोसिन वाटप करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.१७९/म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२०

**संदर्भ** : शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१८/प्र.क्र.२२५/म-३ दिनांक ०८.०३.२०१९

**प्रस्तावना**:

राज्यात अतिवृष्टी व पुर परिस्थितीमुळे निराधार होणाऱ्या कुटुंबांना १० किलो गहू, १० किलो तांदुळ व ५ लिटर केरोसिन मोफत वाटप करण्यास संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. दिनांक ३ जून, २०२० रोजी “निसर्ग” चक्रीवादळाचा तडाखा राज्यातील काही जिल्हयांमध्ये बसला आहे. या परिस्थितीमुळे सामान्य जनजीवन मोठया प्रमाणात विस्कळीत झाले आहे. निसर्ग चक्रीवादळामुळे घरांचे नुकसान झाल्याने अनेक कुटुंब निराधार झालेली आहेत. त्यामुळे दिनांक ९.६.२०२० रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये बाधित जिल्हयांना मोफत अन्न धान्य व केरोसिन वाटप करण्यास मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे. त्यामुळे संदर्भाधीन शासन निर्णयान्वये देण्यात आलेली मोफत अन्नधान्य वाटपाची सुविधा या आपत्ती प्रकरणीही लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:

रायगड व रत्नागिरी जिल्हयात निसर्ग चक्रीवादळामुळे पुर्णत: नष्ट झालेल्या पक्क्या, कच्च्या घरांसाठी व झोपडयांसाठी तसेच अंशत: पडझड झालेल्या (किमान १५% नुकसान) कच्च्या व पक्क्या घरांपैकी ज्या घरांचे छत क्षतीग्रस्त झाल्याने अथवा पत्रे/कौले/छत उडुन गेल्याने घरातील कपडे व घरगुती भाडयांचे/वस्तुंचे नुकसान झाले आहे अशा सर्व निराधार झालेल्या कुटुंबांना प्रति कुटुंब १० किलो गहू, १० किलो तांदुळ व ५ लिटर केरोसिन मोफत पुरविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. अन्नधान्य व केरोसिनच्या वाटपाचे काम तात्काळ पुर्ण करण्यात यावे. अन्नधान्य व केरोसिनचे वाटप पूर्ण केल्यानंतर यासाठी आवश्यक असलेल्या निधीची मागणी संपूर्ण तपशीलासह विभागीय आयुक्त,कोकण यांनी शासनाकडे करावी.

३. या प्रयोजनार्थ होणारा खर्च “मागणी क्रमांक : सी-६, २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२, पुर चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य, (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२) (०६) राहत केंद्रामध्ये निवारा, अन्न,वस्त्र,औषधे इत्यांदीचा पुरवठा ( २२४५ २२४७) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १५८/ २०२०/ व्यय-९, दिनांक ०७.०८.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००८२६१४२६३३८४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.08.26 14:37:00 +05'30'

**( सु. ह. उमराणीकर )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
४. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
५. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई
७. विभागीय आयुक्त,कोकण
८. जिल्हाधिकारी, रायगड/रत्नागिरी
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
११. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड/रत्नागिरी
१३. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१४. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१५. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१६. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१७. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१८. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ ).